**नागरी / ग्रामीण बिगरशेती सहकारी पतसंस्थानी एकुण पतपुरवठयाच्या २० % मर्यादेपर्यंत शेतीकर्ज वितरण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीसीआर-१११५/प्र.क्र.८४/७-स,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई ०३२.
तारीख: २२ मे, २०१५

वाचा -

1. **शासन निर्णय क्रमांकः सीसीआर- ११०२/प्र.क्र.५३१/७-स, दि.२२.१२.२००५**
2. **शासन निर्णय क्रमांकः सीसीआर- ११०९/प्र.क्र.३३८/७-स, दि.१७.११.२००९**

**प्रस्तावना -**

राज्यातील शेतकऱ्यांना जि.म.स. बँका व व्यापारी बँकांमार्फत पीककर्ज पुरवठा करण्यात येत आहे. सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात राज्यात सुमारे रु. ३४,१०० कोटी पीक कर्ज पुरवठा करण्यात आला आहे. तथापि, मागील काही वर्षात राज्यातील बऱ्याच जिल्हयात टंचाई परिस्थिती निर्माण झाल्यामुळे व अवेळी पाऊस अथवा गारपीट यामुळे पीकांचे मोठया प्रमाणात नुकसान झाल्याने शेतकऱ्यांना अधिक प्रमाणात पीककर्ज उपलब्ध करण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे. राज्यातील जास्तीत जास्त शेतकऱ्यांना संस्थात्मक पीककर्ज पुरवठा (Institutional Credit) उपलब्ध करुन देण्यासाठी शासन प्रयत्नशील आहे.

राज्यात नागरी/ ग्रामीण बिगरशेती सहकारी पतसंस्था मोठया संख्येने कार्यरत आहेत. दि.३१.०३.२०१५ अखेर राज्यातील पतसंस्थेमधे सुमारे रु. २४,००० कोटी ठेवी आहेत. अशा संस्थांनी त्यांच्या एकुण पतपुरवठयापैकी २० % पतपुरवठा शेती क्षेत्रास करण्याबाबत वाचा क्र. १ मधील शासन निर्णय निर्गमित करण्यात आला होता. तथापि, ज्या पतसंस्थांनी कृषि क्षेत्रास कर्ज पुरवठा केला आहे अशा शेतकऱ्यांना पतसंस्थांनी केलेल्या कर्जपुरवठयाबरोबरच जि.म.स. बँका व प्राथमिक कृषि पतपतरवठा संस्था यांच्याकडूनही एकाच तारणावर कर्ज पुरवठा झाल्याचे दिसून आल्यामुळे व राज्यशासनाच्या कृषि कर्जमाफी योजनेत पतसंस्थांचा समावेश नसल्यामुळे वाचा क्र. २ मधील शासन निर्णयानुसार वाचा क्र. १ मधील शासन निर्णय रद्द करण्यात आला आहे.

नागरी / ग्रामीण बिगरशेती सहकारी पतसंस्थांनी शेती क्षेत्रासाठी कर्ज पुरवठा करतांना उपविधीतील तरतुदीनुसार पुरेसे तारण घेतल्यास शेती कर्जाची खात्रीने वसुली करणे शक्य आहे. तसेच राज्य शासनामार्फत कृषि कर्जमाफी व कर्ज परतफेड योजना सन २००९-२०१० या आर्थिक वर्षात राबविण्यात आली होती. वाचा क्र. २ मधील शासन निर्णयाच्या प्रस्तावनेत या बाबत नमुद केलेली वस्तुस्थिती सध्याच्या परिस्थितीत गैरलागू आहे. ही बाब विचारात घेता सदयस्थितीत वाचा क्र. २ मधील शासन निर्णयाबाबत फेरविचार करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

राज्यातील नागरी / ग्रामीण बिगरशेती सहकारी पतसंस्थांमार्फत कृषि क्षेत्रास पतपुरवठा करण्याचे धोरण रद्द करण्याबाबतचा वाचा क्र. २ मधील शासन निर्णय सदर शासन निर्णयाव्दारे रद्द करण्यात येत असून वाचा क्र. १ मधील शासन निर्णय कायम ठेवण्यात येत आहे.

वाचा क्र. १ मधील शासन निर्णयाची त्वरीत अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी राज्यातील नागरी / ग्रामीण बिगरशेती सहकारी पतसंस्थासाठी आवश्यक त्या मार्गदर्शक सुचना तात्काळ निर्गमित करण्यात याव्या.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२२१०५२१७०२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Arun Patil

Digitally signed by Santosh Arun Patil
DN: CN = Santosh Arun Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Officer On Special Duty
Date: 2015.05.29 15:04:23 +05'30'

**संतोष पाटील**
विशेष कार्य अधिकारी

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
३. विभागीय सहनिबंधक सहकारी संस्था (लेखापरिक्षण) (सर्व)
४. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
५. जिल्हा विशेष लेखापरिक्षक, सहकारी संस्था (सर्व)
६. महाराष्ट्र राज्य सहकारी पतसंस्था फेडरेशन मर्या. पुणे

**प्रत माहितीस्तव-**

१. मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव
३. मा. प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहायक